**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत (स्त्रोत शाश्वतेंतर्गत) झऱ्यांवर आधारित ग्रामीण लघु नळ पाणी पुरवठा योजना राबविणेबाबत. . .**

**महाराष्ट्र शासन,**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
शासन निर्णय क्र.आपना-१०१०/प्र.क्र.५०/पापु-१५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० फेब्रुवारी, २०१०

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्याच्या पश्चिमेला असलेल्या किनाऱ्यालगतचा भूभाग म्हणजे कोकण प्रदेश. कोकण प्रदेशाचा पूर्व भाग हा सह्याद्री पर्वतरांगांनी व्यापलेला असून पश्चिमेकडे अरबी समुद्र आहे. कोकण प्रदेश जवळ जवळ ७२० कि.मी. लांबीचा असून अति पर्जन्यमानाचा प्रदेश आहे. सहयाद्रिच्या पर्वतरांगांची उंची ५०० ते १४०० मिटर आहे. अति पर्जन्यमानाचा प्रदेश असल्यामुळे डोंगराळ भागात मोठया प्रमाणावर झरे आढळून येतात. कोंकण प्रदेशामध्ये जे झरे किमान दहामाही आहेत त्या झऱ्यांवरुन काही ठिकाणी शेतीदेखील करण्यात येते. सदर झऱ्यांचा वापर उर्वरित कालावधीसाठी पाणी टाक्यामध्ये साठवून गाव/वाडी/वस्त्या यांना पिण्याचे पाणी पुरवठयासाठीसुध्दा करता येऊ शकतो. केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमात पेयजल स्रोत शाश्वततेवर जास्त भर दिला असुन ग्रामीण जनतेला शुद्ध, स्वच्छ, व पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देणे हा उद्देश आहे.

कोकण विभागात अति पर्जन्यमान होऊन देखील उन्हाळ्यामध्ये बऱ्याच गावे/ वाडया/ वस्त्यांना टँकरव्दारे पाणी पुरवठा करावा लागतो. अशा गावांच्या परिसरात झरे असल्यास सदर झऱ्यांचा वापर गाव तसेच गाव/वाडी /वस्त्या यांना पाणी पुरवठा करण्यासाठी करता येणे शक्य आहे. जेणेकरुन, ग्रामस्थांना काही अंशी नळ पाणी पुरवठा योजनेचे लाभ मिळतील. ज्या गाव/वाडी/ वस्त्यांजवळच्या झऱ्यांना सर्वसाधारणपणे फेब्रुवारी-मार्च महिन्यापर्यंत पाणी उपलब्ध असते व त्यानंतर पाण्याची उपलब्धता कमी होते अशा झऱ्यांचे पाणी साठवण टाकीमध्ये साठवून, सदर पाणी टंचाई कालावधीत फक्त पिण्यासाठी वापरता येऊ शकेल. परिणामी अशा

गाव/वाडी/वस्त्यांना उन्हाळ्यात टॅंकरने पाणी पुरवठा करावा लागणार नाही. सदर योजना गुरुत्वाकर्षणावर आधारित असल्याने या योजनेद्वारे ग्रामीण जनतेला ज्या वेळी गावात वीज पुरवठा नसतो त्या वेळी सुद्धा शाश्वत पिण्याचे पाणी अल्पदरात उपलब्ध करुन देणे शक्य होईल. अतिदुर्गम डोंगराळ भागातील जनतेला पिण्याच्या पाण्यासाठी घ्यावे लागणारे कष्ट व वेळ वाचविणे शक्य होईल.

वरील पार्श्वभूमी विचारात घेऊन झऱ्यावर आधारित (शाश्वत) ग्रामीण लघु पाणी पुरवठा योजना राबवून पिण्याच्या पाण्याची समस्या असलेल्या गाव/वाड्या/वस्त्यांचा पिण्याच्या पाण्याचा प्रश्न सोडविणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत (स्त्रोत शाश्वतेंतर्गत) झऱ्यांवर आधारित ग्रामीण लघु नळ पाणी पुरवठा योजना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमार्फत राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. कोकण विभागाप्रमाणेच राज्यात इतरत्रसुध्दा पुरेसे पाणी उपलब्ध असलेले झरे असल्यास अशा भागातही ही योजना राबविता येईल.

२. सदर योजनेमध्ये टंचाईचा कालावधी व गावे/वाड्या/वस्त्यांच्या लोकसंख्येस आवश्यक असलेल्या पाण्याची गरज विचारात घेऊन साठवण टाकीची कमाल क्षमता ठरवावी मात्र ती १ लक्ष लिटर्स पेक्षा जास्त नसावी. या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याकरीता योजनेची संकल्पना व योजना राबविण्याचे निकष, योजना राबविण्यासाठी मार्गदर्शक सूचना, निधीची उपलब्धता व संनियंत्रण इत्यादी बाबी पुढील प्रमाणे आहेत.

**२.१) योजनेची संकल्पना:-**

ज्या गाव/वाडी/वस्त्यांना उन्हाळयात पाणी कमी प्रमाणात उपलब्ध होते अथवा नळ पाणी पुरवठा योजना नाही किंवा नळ पाणी पुरवठा योजना असूनही त्याव्दारे पुरेसे पाणी उपलब्ध होत नाही, अशा वाडयांमध्ये कमाल ३ कि.मी. परिसरात बारमाही किंवा किमान १० महिने पाणी उपलब्ध असलेला झरा असल्यास या झ-याव्दारे वाडी-वस्तीत अतिरिक्त पाणी साठवून तेथिल पाणी पुरवठा व्यवस्था शाश्वत करणे हा या योजनेचा हेतु आहे. तसेच बहुतेक झरे हे अडचणीच्या

ठिकाणी, डोंगरात व बहुधा रात्री प्रकाश व्यवस्था नसलेल्या ठिकाणी, असल्याने त्यातून रात्री पाणी उपलब्ध होणे अवघड होते. विशेषत: उन्हाळयात झऱ्याची क्षमता कमी झाल्यानंतरही साठवण टाकीत रात्रभर पाण्याची आवक होऊन सदर पाणी ग्रामस्थांना अहोरात्र उपलब्ध होईल. पर्यायाने यामुळे शाश्वत व सातत्यपूर्ण पाणी पुरवठयाचे उद्दिष्टही साध्य होईल.

उन्हाळयात एप्रिल-मे महिन्यात झरे आटत असल्यास वाडीतील साठवण टाकीची कमाल क्षमता १ लाख लिटर्स ठेवता येईल. त्यामुळे साठवून ठेवलेले पाणी ग्रामस्थांना टंचाई कालावधीत पिण्यासाठी उपलब्ध होवून पाणी पुरवठा शाश्वत होईल व पेयजल टंचाईचा कालावधी निश्चितपणे कमी होईल.

**२.२) योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक तत्वे:-**

**(१) गाव/वाडया/वस्त्यांच्या निवडीचे निकष :-**

खालील निकषांची पुर्तता करणा-या गाव/वाडया/वस्त्यात ही योजना राबविण्यात यावी.

१. गाव/वाडी/वस्तीच्या जवळपास बारमाही अथवा किमान दहा महिने पुरेसे पाणी उपलब्ध असलेला झरा असणे आवश्यक आहे.

२. ज्या गावे/वाडया/वस्त्यामध्ये उन्हाळयात दरडोई/दरदिवशी ४० लिटरपेक्षा कमी पाणी उपलब्ध होते अथवा नळ पाणी पुरवठा योजना असूनही त्याद्वारे पुरेसे पाणी उपलब्ध होत नाही किंवा नळ पाणी पुरवठा योजना नाही अशा गावे / वाडया / वस्त्या.

३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ग्रापापु-१००१/प्र.क्र.३३०/पापु-०७, दि. १४.०२.२००२ नुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील गठीत करण्यात आलेल्या शिवकालीन पाणी साठवण योजना राबविणाऱ्या समितीमार्फतच ही योजना राबविण्यात येईल. समितीची रचना व कार्ये **विवरणपत्र-१** मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहतील.

४. प्रस्तुत योजना ग्रामपंचायतीद्वारे राबविण्यात येईल. यासाठी आवश्यक ते तांत्रिक मार्गदर्शन भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचे जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद हे करतील. त्यासाठी ग्रामपंचायतीने योजनेच्या मागणीसाठी ठराव करुन समितीस सादर करणे अनिवार्य असेल.

५. गाव/वाडी/वस्तीच्या निवडीसाठी ग्रामसभेच्या संमतीचा ठराव घेणे अनिवार्य राहील.

६. झऱ्याचा उगम / टाकीची जागा शासकीय जागेत असल्यास बांधकामासाठी बक्षिस पत्राची आवश्यकता नाही. तथापि, ग्रामपंचायतीच्या जागेत बांधकामासाठी ग्रामपंचायतीचे सहमतीपत्र अथवा खाजगी जागेत बांधकामासाठी जागा मालकाचे बक्षिसपत्र घेण्यात यावे. सदर बक्षिसपत्रासाठी होणारा खर्च योजनेतून देय राहील. ही रक्कम योजनेच्या सहाय्यक निधीतून जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिकांद्धारे अदा करण्यात येईल.

**(२) प्रकल्प अहवाल :-**

गाव/वाडी/वस्तीची निवड झाल्यावर प्रस्तावित उपाययोजनेसाठी जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक भूसवियं यांनी अहवाल तयार करावा. यात झऱ्याची क्षमता, पाण्याची गुणवत्ता, गाव/वाडी/वस्तीपासून झऱ्याचे अंतर, पाणी पुरवठा साधनांची सद्यस्थिती, लोकसंख्या, दरडोई पाण्याची आवश्यकता, भूशास्त्रीय जडण घडण इत्यादी बाबतची माहिती अंतर्भूत असावी.

**(३) योजनेची अंमलबजावणी :-**

सदर योजना ग्रामपंचायतीद्धारे राबविण्यात येणार असून योजना पूर्ण करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील. या योजनेचे संनियंत्रण जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे मार्फत केले जाईल. या योजनेंतर्गत प्राकलने व आराखडे तयार करणेसाठी खाजगी स्थापत्य अभियंत्याच्या कंत्राटी पध्दतीने सेवा घेण्यास मंजूरी देण्यात यावी. यासाठी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचेकडील क्र. ग्रापाधो-११०९/प्रक्र-११५/पापु-०७, दि.०९ सप्टेंबर २००९ नुसार विहीत पध्दतीने निवडण्यात आलेल्या कंत्राटी अभियंत्यांच्या सेवा घेण्यात याव्यात. या योजनेंतर्गत झालेल्या कामाची तपासणी व कामाच्या मोजमापांच्या नोंदी मोजमापे नोंदवही (Measurement Book) मध्ये नोंदविण्याची कार्यवाही कंत्राटी अभियंता यांनी करावी.

**(४) तांत्रिक व प्रशासकीय मान्यता :-**

१. या योजनेसाठी तांत्रिक मान्यता कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद हे देतील.
२. या योजनेसाठी प्रशासकीय मान्यता शिवकालीन योजनेसाठी कार्यरत असलेल्या जिल्हास्तरीय समितीद्धारे प्रदान करण्यात येईल.
३. कंत्राटी स्थापत्य अभियंत्याने अथवा जि.प. अभियंत्यानी तयार केलेला प्रकल्प अहवाल (संकल्प चित्रे व प्राकलने, इ.) संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी तांत्रिक मंजूरी दिल्यानंतर जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी प्रशासकीय मान्यतेसाठी जिल्हास्तरीय समितीपुढे सादर करावा.
४. जिल्हास्तरीय समितीने एकाच बैठकीत प्रशासकीय मान्यता देणे आवश्यक आहे.

**(५) <u>योजनेंतर्गत करावयाची स्थापत्य कामे</u> :-**

सदर योजनेंतर्गत प्रस्तावित कामे ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्व्च्छता समितीमार्फत राबविण्यात येतील. सदर स्थापत्य कामे **विवरणपत्र-२** मध्ये विहित केलेली आहेत. तसेच स्थापत्य बांधकामाची कार्यपध्दती **विवरणपत्र-३** मध्ये विहित केलेली आहे.

**(६) <u>निधीची उपलब्धता व योजनेची किंमत:-</u>**

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत स्त्रोत शाश्वतीकरणासाठी उपलब्ध होणाऱ्या निधीतून झऱ्यावर आधारीत ग्रामीण लघु नळ पाणी पुरवठा योजनेसाठी अनुदान उपलब्ध होईल. या योजनेच्या अंमलबजावणी व सहाय्यक सेवांकरीता निधी उपलब्ध करुन देण्यात येईल, व या निधीची वित्तीय मर्यादा व आर्थिक भार खालीलप्रमाणे राहील.

**६.१) <u>अंमलबजावणी निधी :-</u>**

या योजनेसाठी प्रती योजना रु.१०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त) एवढी खर्चाची कमाल मर्यादा असुन त्यापेक्षा जास्त खर्च अपेक्षित नाही. हा योजनेच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीसाठी निधी जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचेमार्फत ग्राम पंचायत /ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीकडे वर्ग करण्यात येईल. सदर कामे सुरु करण्यासाठी ग्राम पंचायत /ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीकडे एकूण अंदाजपत्रकीय रक्कमेच्या २० टक्के निधी सुरुवातीस वर्ग केला जाईल. त्यानंतर योजनेच्या उर्वरित सर्व कामापोटीच्या जास्तीत जास्त ४ विविध टप्प्यात देयके अदा करण्यात यावी.

**६.२) <u>सहाय्यक सेवा निधी :-</u>**

यामध्ये कंत्राटी अभियंत्यास त्याचे मानधन , प्रवासभत्ता, संपर्क, दूरध्वनी इंटरनेट इत्यादी बाबी तसेच भाडेतत्वावरील खाजगी वाहन, प्रकल्प अहवाल तयार करणे, तसेच जागेच्या बक्षिसपत्रासाठी येणारा खर्च याचा समावेश असेल.

(१) कंत्राटी अभियंत्यास त्याचे मानधन पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्र. ग्रापाधी-११०९/प्र.क्र.११५/पापु-०७, दि.०९ सप्टेंबर, २००९ नुसार विहित केलेल्या वित्तीय मर्यादेनुसार वरीष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे अदा करतील.तसेच या अभियंत्यांना प्रवास भत्ता व दूरध्वनी करीता होणारा खर्च विवरणपत्र-४ मध्ये विहित दराने व विहित कालावधीकरीता अनुज्ञेय राहील

(२) योजनांच्या संनियंत्रणासाठी घेतलेल्या भाडेतत्वावरील खाजगी वाहनांच्या देयकांची अदायगी विवरणपत्र-४ मध्ये विहित दराने व विहित कालावधीकरीता अनुज्ञेय असेल.

(३) प्रकल्प अहवाल जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक तयार करतील व यासाठी त्यांना प्रति योजना रु.१०,०००/- लक्ष इतकी रक्कम देय राहील.

(४) बक्षिसपत्रासाठी येणारा प्रत्यक्ष खर्च संबंधितांना वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे अदा करतील.

**(७) अनुदान वितरण प्रणाली:-**

या योजनेच्या अंमलबजावणीसाठी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना अनुदान उपलब्ध करुन दिले जाईल. जिल्हास्तरीय समितीद्वारे मंजूर कामासाठी आवश्यक अनुदानाची मागणी जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी सादर केल्यानंतर संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडून संबंधित विभागीय उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, यांचेमार्फत संबंधित जिल्ह्यांना अनुदान वितरीत करण्यात येईल.

**(८) योजनेच्या बांधकामाच्या देयकांची अदायगी:-**

ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीने योजनेच्या प्रत्यक्ष बांधकामासाठी खर्चाबाबत जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचेकडे सादर केलेल्या देयकांची अदायगी विहीत शासकीय प्रणालीप्रमाणे जिल्हास्तरीय समिती अध्यक्ष व सदस्य सचिव यांच्या संयुक्त स्वाक्षरीने करण्यात यावी. योजनेसाठी झालेल्या कामापोटी जास्तीत जास्त ४ विविध टप्प्यात देयके प्रदानार्थ सादर करता येतील.

**(९) पूर्ण झालेल्या योजनेचे ग्रामपंचायतीस हस्तांतरण :-**

झऱ्यावर आधारीत ग्रामीण लघु पाणी पुरवठा योजनेची विहित कामे पूर्ण होऊन योजना कार्यान्वित झाल्यानंतर ग्रामपंचायतीस पूर्णपणे हस्तांतरीत करावी. सदर योजनेच्या भविष्यातील देखभाल व दुरुस्तीची कामे ग्रामपंचायतीनेच करावयाची आहेत. त्यासाठी अपेक्षित खर्च भागविण्यासाठी आवश्यक ती पाणीपट्टी ग्रामपंचायतीने आकारावी.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००२ २०१२४५४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( मालिनी वि. शंकर )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. विभागीय आयुक्त, सर्व.
२. जिल्हाधिकारी (सर्व )
३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
५. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
६. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व.
७. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,सर्व
८. सर्व नियंत्रक अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
१०. निवड नस्ती पापु-१५

## विवरणपत्र-१

## जिल्हास्तरीय समितीची रचना व कार्य

**समितीची रचना :-**

या योजनेसाठी ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीकडून आलेला नियोजन व कृति आराखडा त्याअंतर्गत प्रस्ताव तपासून व इतर अनुषंगिक कार्यवाही करण्यासाठी व निधी उपलब्ध करण्याची शिफारस पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय, क्रमांक ग्रापापु-१००१/प्रक्र-३३०/पापु-०७, दिनांक १४ फेब्रुवारी २००२ अन्वये शिवकालीन पाणी साठवण योजना राबविण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली जिल्हास्तरीय समिती करेल.

याशिवाय समिती आवश्यकतेनुसार या क्षेत्रातील तज्ञ, संबंधित शासकीय खात्याचे अधिकारी यांना देखील आमंत्रित करु शकेल.

**समितीचे कार्य :-**

- उपाययोजना राबविण्यासाठी गाव/ वाडी/वस्तीची निवड करणे.
- कंत्राटी स्थापत्य अभियंत्याची निवड करणे. यासाठी ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी कंत्राटी अभियंत्याच्या सेवा घेण्याबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र. ग्रापाधो-११०९/प्रक्र-११५/पापु-०७, दिनांक ९ सप्टेंबर २००९, मध्ये विहीत पध्दतीने निवडण्यात आलेल्या कंत्राटी अभियंत्याच्या सेवा घेण्यात याव्यात.
- कंत्राटी स्थापत्य अभियंत्याने तयार केलेल्या प्रकल्प अहवालास तांत्रिक मान्यता कार्यकारी अभियंता (ग्रापापु), जि.प. यांनी प्रदान करणे. तद्नंतर जिल्ळा समितीने प्रशासकीय मान्यता देणे.
- प्रस्तावित स्थापत्य कामे ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीकडून करुन घ्यावीत.
- प्रत्यक्ष बांधकामासाठी नेमलेल्या ठेकेदाराने केलेल्या कामांच्या देयकांची अदायगी समितीचे अध्यक्ष व सदस्य सचिव यांच्या संयुक्त स्वाक्षरीने करणे.
- योजना विहित कालावधीत पूर्ण करण्याची जबाबदारी जिल्हा समितीची राहील.

*******

## विवरणपत्र-२

### झऱ्यावरील लघु नळ पाणी पुरवठा योजनेची स्थापत्य बांधकामे

या योजनेंतर्गत खालीलप्रमाणे स्थापत्य कामे असतील.

- ❖ झऱ्याजवळच्या भागाची स्वच्छता व झ-याच्या उगमाजवळ पाणी संकलीत/ गोळा करण्यासाठी लहान जलकुंड (Collection Chamber) बांधणे. जलकुंडाची कमाल मोजमापे १ x १ x १ मी. अशी असतील.
- ❖ झऱ्यापासून ते साठवण टाकी पर्यंतची पाईप लाईन उभारणी जमिनीखाली ०.५० मीटरचा खड्डा/चर खोदून करावी . पाईप लाईनसाठी ८ कि. ग्रॅ./सें.मी. प्रेशरचा, ६३ किंवा ७५ मि.मी. व्यासाचा एच.डी.पी.ई. पाईप (भारतीय मानक संकेतांक ४९८५ ) वापरावा.
- ❖ झऱ्याचा उगम ते साठवण टाकी (GSR) दरम्यान दर २०० मी. अथवा योग्य अंतरावर एअर चेंबर (Air Chamber) बांधावे.
- ❖ पाणी साठवण टाकी व झऱ्याचा उगम या मध्ये गाळण संयंत्र (On line Pipe Filter or any) बसविण्यात यावे
- ❖ गाव/वाडी/वस्तीजवळ आवश्यकतेनुसार कमाल एक लक्ष लिटर क्षमता असलेली पाणी साठवण टाकी बांधण्यात यावी. सदर टाकी GSR प्रकारची असावी.
- ❖ टाकी जवळ नळ कोंडाळे उभारणी. (स्टँड पोस्ट)
- ❖ नामफलक उभारणी करावी, नामफलकाचा आकार १ मी. x १.५ मी. असावा.

**********

## विवरणपत्र-३
## स्थापत्य बांधकामाची कार्यपध्दती

या योजनेची स्थापत्य कामे पूर्ण करुन घेण्यासाठी जिल्हास्तरीय समिती खालील पध्दतीचा अवलंब करेल.

- प्रस्तावित कामे ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीद्धारे राबविण्यात येतील.
- प्राकलने व आराखडयानुसार कंत्राटी अभियंता यांनी Lay Out दिलेल्या ठिकाणीच कामे सुरु करण्यात यावीत.
- या योजनेंतर्गत झालेल्या कामांची तपासणी आवश्यकतेनुसार संबंधित जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा तसेच विभागीय उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे कार्यालय किंवा संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्या मार्फत करण्यात येईल.
- झालेल्या कामाच्या दर्जाबाबत अभियांत्रिकी महाविद्यालय / पॉलिटेक्नीक यासारख्या त्रयस्थ संस्थेकडून ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी प्रमाणिकरण करुन घेणे आवश्यक राहील व त्यानंतरच अंतिम देयक अदा करण्यात येईल.

*********

## विवरणपत्र-४

### आवश्यक अनुदानाचा तपशिल, बाबनिहाय मर्यादा व संभाव्य वित्तीय भार (वार्षिक)

| अ.क्र. | निधीचा प्रकार | रु. लक्ष |
|---|---|---|
| अ. | **अंमलबजावणी निधी :**<br>रु. १०. ०० लक्ष प्रति योजना x १० योजना x ४ जिल्हे | ४००.०० |
| | **एकूण** | **४००.००** |
| ब. | **सहाय्यक सेवा निधी :**<br>**१. कंत्राटी अभियंत्यास देय रक्कम** | |
| | ❖ **मानधन**<br>१ अभियंता x रु.०.१२ लक्ष प्रतिमाह मानधन x १२ महिने x ४ जिल्हे | ५.७६ |
| | ❖ **ंप्रवास भत्ता**<br>१ अभियंता x रु. ०.००१ लक्ष प्रतिदिन x २०दिवस x१२ महिने x ४ जिल्हे | ०.९६ |
| | ❖ **संपर्क, भ्रमणदूरध्वनी, इंटरनेट, इत्यादीसाठी**<br>१ अभियंता x रु. ०.०१ लक्ष दरमहा x १२ महिने x ४ जिल्हे | ०.४८ |
| | **एकूण** | **७.२०** |
| | **२. भाडेतत्वावरील खाजगी वाहने**<br>(प्रति कार्यालय १ वाहन x ०.०२ लक्ष प्रतिदिन दराने प्रत्येक महिन्यात कमाल ५ दिवसांसाठी )<br>१ वाहन x०.०२ लक्ष प्रतिदिन x ५ दिवस x १२ महिने x ४ जिल्हे | **४.८०** |
| | **३. प्रकल्प अहवाल तयार करणे**<br>१० योजना प्रति जिल्हा x ०.१० लक्ष प्रति योजना प्रमाणे x ४ जिल्हे | **४.००** |
| | **४. बक्षिसपत्रासाठी येणारा संभाव्य खर्च**<br>१० योजना प्रति जिल्हा x ०.०५ लक्ष प्रति योजना x ४ जिल्हे | **२.००** |
| | **एकूण 'ब' ( १ + २ + ३ + ४ )** | **१८.००** |
| | **एकूण बेरीज (अ+ब)** | **४१८.००** |